अग्रिमधारकांना अग्रिम विषयक माहिती पुरविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक: घबांअ-1095/प्र.क्र.19/95/विनियम,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक:- 15 मे, 1998.

**प्रस्तावना:-** शासकीय कर्मचा-यांना/अधिका-यांना शासनाकडून घरबांधणी अग्रिम/मोटार कार अग्रिम/संगणक अग्रिम इत्यादी अग्रिमे मंजूर करण्यात येत असतात. याबाबत असे निदर्शनास आले आहे की, कर्मचा-यांना संबंधित कार्यालयाकडून अग्रिमाच्या वसूलीविषयी सविस्तर माहिती पुरविण्यात येत नाही. त्यामुळे कर्मचा-यांच्या निवृत्तीच्यावेळी किंवा इतर अनेक बाबतीत अडचणी उद्‌भवतात. अग्रिमधारकांना त्यांनी घेतलेल्या अग्रिमाच्या वसूलीबाबतची माहिती पुरविण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-** शासनाच्या सर्व कार्यालयातील आहरण व संवितरण अधिका-यांनी त्यांच्या कार्यालयात काम करीत असलेल्या घरबांधणी अग्रिम/मोटार कार अग्रिम/संगणक अग्रिम धारकांना वित्तीय वर्षा अखेरची अग्रिम वसूली-बाबतची माहिती प्रत्येक वर्षी दिनांक 30 जून पर्यंत सोबतच्या विवरणपत्राप्रमाणे पुरवावी. तसेच अग्रिमावरील व्याजाची रक्कम अग्रिमाची पूर्ण वसूली झाल्यानंतरच्या लगतच्या महिन्याच्या विवरणपत्रातून पुरवावी. परंतु सेवानिवृत्तीला फक्त 3 महिने असणा-या अग्रिम धारकांना व्याजाची माहिती सेवानिवृत्तीपूर्वी 3 महिने आधी विवरणपत्राद्वारे पुरविण्यात यावी. सन 1997-98 या वित्तीय वर्षापासून या निर्णयाप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अं. ज. खानविलकर
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग,

सहपत्र : विवरणपत्र.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1 महाराष्ट्र, मुंबई-400 020,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-1 महाराष्ट्र, मुंबई-400 020,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,
* प्रमुख न्यायाधीश कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई-400 051,
उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,

(कृ.मा.प.

एच-378(12500+10-5-98)।

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांच्या अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली 110001,
वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथालयात 5 प्रती),
निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

-------------

* पत्राने.

( शासन निर्णय, क्रमांक: घबांअ-1095/प्र.क्र.19/95/विनियम, दिनांक 15 मे, 1998 सोबतचे विवरणपत्र )

## विवरणपत्र

श्री./श्रीमती ———————— पद ———————— यांनी ———————— या उद्देशासाठी घेतलेल्या अग्रिमाची वित्तीय वर्ष ———————— अखेरपर्यंतची ( 31 मार्च        पर्यंतची ) माहिती दर्शविणारे विवरणपत्र.

| अग्रिम मंजूरीची व हप्ते मंजूरीची रक्कम व दिनांक | | | अग्रिमफेडीच्या दरमहा हप्त्याची रक्कम व एकूण हप्ते. | | वित्तीय वर्षाच्या आरंभी एकूण वसूल अग्रिम व वसूल हप्ते. | | वित्तीय वर्षात वसूल रक्कम व वसूल हप्ते | | वित्तीय वर्षाच्या शेवटी शिल्लक अग्रिम व हप्ते | | शेरा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अग्रिम हप्ते | रक्कम (रुपये) | दिनांक | दरमहाचा हप्ता (रुपये) | एकूण हप्ते | रक्कम (रुपये) | हप्ते | रक्कम (रुपये) | हप्ते | रक्कम (रुपये) | हप्ते | |
| | | | | | | | | | | | |

(नाव:-                                    )
आहरण व संवितरण अधिकारी
कार्यालयाचे नाव व पत्ता .

टीप:- व्याज वसूलीची माहिती अग्रिमाची वसूली पूर्ण झाल्यानंतरच्या महिन्यापासून देण्यात यावी व सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांच्या बाबतीत सेवानिवृत्तीच्या 3 महिने पूर्वी देण्यात यावी.

एच-378(12500+10-5-98)2